**जिल्हा हिवताप अधिकारी, पालघर यांचे कार्यालयातील नवनिर्मित १० अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः हिनिका - २०१९ /प्र.क्र. ९४ /आरोग्य-५

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: १५ मार्च,२०२२

वाचा -

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक -पदनि २०१८/प्र.क्र.४० (भाग-२) /आरोग्य -३, दिनांक- २३.०५.२०१८.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक -पदआ२०१९/प्र.क्र.९४/आरोग्य-५, दिनांक- २३.०८.२०२१
३) संचालक, आरोग्य सेवा,पुणे यांचे पत्र क्र.संआसे/राहिनिका/पालघर/अस्थायीपदे/ चालूठेवणेबाबत/६९१/२०२२ दि.११.०१.२०२२
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. २२/०२/२०२२

**शासन निर्णय-**

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पालघर येथे जिल्हा हिवताप अधिकारी कार्यालय स्थापन करण्यात आले आहे. सदर कार्यालयासाठी नियमीत १० अस्थायी पदांची निर्मिती करण्यात आलेली आहे.

२. जिल्हा हिवताप अधिकारी, पालघर कार्यालयातील नव्याने निर्माण केलेल्या १० नियमीत अस्थाई पदांना दि. ०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत संदर्भाधिन अनु.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये पुढे चालू ठेवण्यात आली होती. सदर मुदत दि.२८.०२.२०२२ रोजी संपुष्टात आली आहे. सदरील पदे पालघर जिल्ह्यातील जनतेस आरोग्य विषयक सेवा सातत्याने उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने आवश्यक असल्याने, सदरची १० नियमीत अस्थायी पदे दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी व ग्रेड पे | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | जिल्हा हिवताप अधिकारी | १५६००-३९१०० ग्रेड पे- ४४०० | १ |
| २ | अवैद्यकीय आरोग्य अधिकारी | ९३००-३४८०० ग्रेड पे- ४३०० | १ |
| ३ | अधिक्षक | ९३००-३४८०० ग्रेड पे- ४३०० | १ |
| ४ | आरोग्य पर्यवेक्षक | ९३००-३४८०० ग्रेड पे- ४३०० | १ |
| ५ | आरोग्य सहाय्यक | ५२००-२०२०० ग्रेड पे- २४०० | २ |
| ६ | किटक संमाहारक | ५२००-२०२०० ग्रेड पे- २४०० | २ |
| ७ | वरिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० ग्रेड पे- २४०० | २ |
| **एकूण** | | | **१०** |

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२२-२३ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-आर-१**
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
१०१ - रोग व प्रतिबंध व रोग नियंत्रण
०१-०५ - हिवताप रोग नियंत्रण कार्यक्रम
(२२१०० ६११)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या,दिनांक २२.०२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१०११२१२३६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Tanaji Dhondiram Saravane
Date: 2022.03.15 15:52:27 +05'30'
Adobe Reader version: 11.0.20

**(तानाजी सरावणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये- राज्यस्तर), मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
६. सहसंचालक आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय) पुणे.
७. सहसंचालक आरोग्य सेवा (हि.ह.व ज.ज.रोग) पुणे.
८. उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे
९. जिल्हा शल्य चिकित्सक,जिल्हा रुग्णालय, पालघर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर.
९. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३)